गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) राबविणे, कशा प्रकारे शक्य होईल याचा अभ्यास करण्यासाठी नियुक्त समितीच्या मानधनाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.जविप्र २०१५/प्र.क्र. २९४/जवि**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक : २४ ऑगस्ट, २०१८**

**पहा :** शासन निर्णय क्रमांक जविप्र २०१५/प्र.क्र. २९४/जवि, दिनांक २०.०६.२०१८

**प्रस्तावना :**

गुंजवणी सिंचन प्रकल्पाचे कालवा/ वितरण प्रणाली दाबयुक्त बंद पाईपव्दारे व त्यापुढे ठिबक पध्दतीने सिंचन करण्याच्या प्रस्तावित संकल्पनेस कोणतीही बाधा न येऊ देता, गुंजवणी जलविद्युत प्रकल्प (१ X २ मेगावॅट) राबविणे, कशा प्रकारे शक्य होईल याचा अभ्यास करण्यासाठी श्री. शि.मा. उपासे, सेवानिवृत्त सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २०.०६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये एक सदस्यिय समिती गठीत करण्यात आलेली आहे. तथापि श्री. उपासे यांना द्यावयाचे मानधन व भत्ते निश्चित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

श्री. उपासे, सेवानिवृत्त सचिव यांना द्यावयाचे मानधन व भत्यांसंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१. एक सदस्य समितीच्या सदस्यास बैठका व अन्य कामकाजाकरिता महिन्यातील कमाल कामकाजाच्या २० दिवसांसाठी रुपये ३,५००/- प्रति दिवस प्रमाणे रुपये ७०,०००/-(रुपये सत्तर हजार फक्त) व स्टेशनरी, दुरध्वनी, फॅक्स, झेरॉक्स, टंकलेखन इत्यादी साठी अंदाजित ठोक रक्कम रुपये १५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) असे एकूण रुपये ८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) मंजूर करण्यात येत आहेत.
२. सदर मानधन रक्कमेत भोजनादी खर्च (Boarding charges) अंतर्भूत असेल.
३. दैनिक मानधनाच्या दरात अन्य सर्व खर्च समाविष्ट असल्याने दैनिक भत्ता स्वतंत्रपणे अनुज्ञेय नसेल.
४. सदस्यांना कामाकाजाच्या ठिकाणी येण्यासाठी व जाण्यासाठी वाहन व्यवस्था महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.
५. यासाठी होणारा खर्च महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ पुणे यांच्या सन २०१८-१९ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७५/व्यय १२, दि.१६.०७.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक क्र.२०१८०८२७१२१२४४८४२७ असा आहे. हा आदेश डिजीडल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dnyandeo Ananda Bagade

Digitally signed by Dnyandeo Ananda Bagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6c9c3f117cf64b38033df6ee6108697532342ef3db994d443607916435f8516, serialNumber=857832272f9c6e57a4d72f8a22cf41cccb1c816e7374da487ed5ee3e377def65, cn=Dnyandeo Ananda Bagade
Date: 2018.08.27 12:15:10 +05'30'

**(ज्ञा. आ. बागडे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत :**

१) मा. मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (प्र. स.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) श्री. श्री. शि.मा. उपासे, निवृत्त सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, महाराष्ट्र
८) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
९) मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
१०) मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, पुणे.
११) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
१२) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.
१३) जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ.